सन २०२३-२४ साठी विभागीय/ जिल्हा/ तालुका (५) क्रीडा संकुलांच्या परिरक्षण करीता निधी वितरीत करणेबाबत
(लेखाशीर्ष-२२०४ ५३१२)

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-३०२४/प्र.क्र.२३/क्रीयुसे-१,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १२ मार्च, २०२४

वाचा :-

१. शासन निर्णय, सामाजिक न्याय व क्रीडा विभाग क्रमांक-राक्रीधो-२००३/(प्र.क्र.११/०३)/क्रीयुसे-१, दिनांक २६ मार्च,२००३.
२. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.संकिर्ण-३०२४/प्र.क्र.२३/क्रीयुसे-१, दि.२४.०१.२०२४.
३. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.संकिर्ण-३०२४/प्र.क्र.२३/क्रीयुसे-१, दि.१३.०२.२०२४.
४. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे क्र.ताक्रीसं/देदु/निमा/निवि/२०२३-२४/का-९/५६७०,दिनांक २९.०२.२०२४ चे पत्र.
५. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र संकीर्ण -२०२४/प्र.क्र.११/२०२४/कोषा प्रशा-५, दि.४.३.२०२४

प्रस्तावना :-

महाराष्ट्र राज्य क्रीडा धोरण, २००१ अंतर्गत महाराष्ट्र राज्यामध्ये क्रीडाविषयक पायाभूत सुविधा निर्माण करणे, राज्यातील नागरिक व खेळाडूंना सराव, प्रशिक्षणासाठी विभाग, जिल्हा व तालुका स्तरावर क्रीडा संकुलांची स्थापना करण्यात आलेली आहे. या संकुलांच्या दैनंदिन परिरक्षणाकरीता/देखभाल व दुरुस्तीकरीता, संदर्भ क्र.१ येथील दिनांक २६ मार्च, २००३ च्या शासन निर्णयातील, परिच्छेद-२ व ६ मधील तरतूदीनुसार खालीलप्रमाणे परिरक्षण (देखभाल दुरुस्ती) निधी अनुज्ञेय आहे :-

| अ. क्र | संकुलाचा प्रकार | प्रथम वर्षाकरिता | द्वितीय वर्षाकरिता | तृतीय वर्षाकरिता |
|---|---|---|---|---|
| १ | विभागीय क्रीडा संकुल | १५.०० लाख | १२.५० लाख | १०.०० लाख |
| २ | जिल्हा क्रीडा संकुल | १०.०० लाख | ७.५० लाख | ५.०० लाख |
| ३ | तालुका क्रीडा संकुल | **प्रतिवर्षी ३.०० लाख** | | |

२. राज्यातील विभागीय/ जिल्हा / तालुका क्रीडा संकुलाच्या दैनंदिन परिरक्षणाकरीता /देखभाल व दुरुस्तीकरीता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता सुधारीत अंदाजानुसार जिल्हा क्रीडा संकुलाचे परिरक्षण, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)

या उद्दीष्टा अंतर्गत रु.२०००.०० लक्ष इतकी तरतूद अर्थसंकल्पीत आहे. संदर्भ क्र.२ अन्वये त्यामधून रु.२८७.९५२ लक्ष व संदर्भ क्र.३ अन्वये रु.८८.३४ लक्ष अशी एकूण रु.३७६.२९२ लक्ष इतकी तरतूद यापूर्वी वितरीत करण्यात आलेली आहे. शिल्लक रु.१,६२३.७०८ लक्ष तरतूदीमधून उपरोक्त संदर्भ क्र.४ अन्वये क्रीडा संचालनालयाने मागणी केल्यानुसार तालुका क्रीडा संकुलांकरिता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यातील विभागीय / जिल्हा / तालुका क्रीडा संकुलाच्या देखभाल व दुरुस्तीकरीता मागणी क्र.ई-३, २२०४ क्रीडा व युवक सेवा, (१६)(०३) जिल्हा क्रीडा संकुलांचे परिरक्षण (कार्यक्रमांतर्गत योजना), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), संगणक क्रमांक २२०४-५३१२ या लेखाशिर्षांतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठीच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून खालील नमूद ५ तालुका क्रीडा संकुलांना त्यांच्या नावासमोर दर्शविल्यानुसार परिरक्षणाकरीता एकूण रु.१४,९४,०००/- (अक्षरी रुपये चौदा लक्ष, चौऱ्याण्णव हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास व सदर वितरीत निधी आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे:-

**सन २०२३-२४ करीता परिरक्षण निधी वितरीत केलेल्या संकुलांची यादी**

| अ.क्र | जिल्हा | अ. क्र. | तालुका क्रीडा संकुलाचे नाव | तालुकानिहाय देय मानधन अनुदान (रुपये) | तालुकानिहाय मानधन अनुदान वजा जाता देय अनुदान (रुपये) | तालुका निहाय मंजूर एकूण अनुदान (रुपये) | जिल्हानिहाय मंजूर एकूण अनुदान (रुपये) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | रायगड | १ | पनवेल | २६४००.०० | २७३६००.०० | ३०००००.०० | ३०००००.०० |
| २ | भंडारा | २ | पवनी | १४४०००.०० | १५००००.०० | २९४०००.०० | ५९४०००.०० |
| | | ३ | तुमसर | १५८४००.०० | १४१६००.०० | ३०००००.०० | |
| ३ | वर्धा | ४ | हिंगणघाट | १३२०००.०० | १६८०००.०० | ३०००००.०० | ३०००००.०० |
| ४ | लातुर | ५ | निलंगा | १५८४००.०० | १४१६००.०० | ३०००००.०० | ३०००००.०० |
| **एकूण रुपये** | | | | **६१९२००.००** | **८७४८००.००** | **१४९४०००.००** | **१४९४०००.००** |

२. क्रीडा संकुलांना वरीलप्रमाणे परिरक्षणाकरीता /देखभाल व दुरुस्तीसाठी मंजूर निधी वितरीत करताना खालील बाबींची पुर्तता करावी:-

I. परिरक्षण/ देखभाल-दुरुस्तीसाठी मंजूर निधी आवश्यकतेनुसार व मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा असेल, त्याच वेळी आहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये.

II. निधी वितरणाबाबत वित्त विभागाद्वारे वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेले वित्त विषयक विविध आदेश/नियम/ शासन निर्णय व वित्तीय अधिकार नियमावली यांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

III. वितरीत निधीच्या विनियोगाबाबत आवश्यक उपयोगिता प्रमाणपत्र विहित कालावधीत सादर करण्यात यावे.

४. वरील बाबींवरील खर्च सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता, मागणी क्रमांक ई-३, प्रधान लेखाशीर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१६) (०३) जिल्हा क्रीडा संकुलांचे परिरक्षण (कार्यक्रम) (२२०४ ५३१२), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

५. यासंदर्भात तालुका क्रीडा संकुल समितीच्या प्रशासकीय खर्चासाठी प्रत्येक जिल्हयापुढे दर्शविलेल्या मंजूर रकमेकरीता, संबंधीत जिल्हा क्रीडा अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, परिपत्रक, दिनांक ४.०३.२०२४ अन्वये विहित केलेल्या तरतूदीनुसार व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, भाग-१, वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.विअप्र-२०.१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारांतर्गत किंवा प्रशासकीय विभागाला वेळोवेळी वित्तीय अधिकार नियमपुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान केलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहेत.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१२१७०२३११४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**सोबत: वरीलप्रमाणे.**

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2024.03.12 17:13:16 +05'30'

**( रणसिंग डेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मा.राज्यपालांचे कार्यालय, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.मंत्री ( क्रीडा व युवक कल्याण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव, क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) -१/२, महाराष्ट्र , मुंबई/नागपूर.
८) महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१/२,महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
९) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) संबंधित उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, (क्रीडा संचालनालयामार्फत)
११) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (संचालनालयामार्फत)
१२) संबंधित सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी, क्रीडा व युवक सेवा, (क्रीडा संचालनालयामार्फत),
१३) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत)
१४) वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई-३२.
१५) अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१६) निवड नस्ती (क्रीयुसे-१)